**नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राची स्थापना ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्सच्या सदस्याच्या नियुक्ती बाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : -टिआरआय-२०१४/प्र.क्र.०६/का.०५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०५ सप्टेंबर, २०१५.

वाचा :-

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक ०४.०३.२०१४

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक २३.०३.२०१५

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक १४.०७.२०१५

४) आदिवासी विकास विभाग, पत्र क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक ०२.०९.२०१५

**प्रस्तावना : -**

नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राची स्थापना करण्यास शासन निर्णय दिनांक ०४.०३.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली आहे. सदर सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राची रचना व त्यामार्फत राबवावयाच्या विविध कार्यक्रमाबाबत शिफारसी करण्याकरीता शासन निर्णय दिनांक २३.०३.२०१४ अन्वये समिती गठीत करण्यात आली आहे. तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांचे व त्यांच्या अधिनस्त अधिकारी/कर्मचारी यांचे निवासस्थान असलेल्या ५.५५ एकर जमीनीवर अस्तित्वातील बांधकामाचा पुर्नविकास करुन सदर जागेत गोंडवना सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र बांधकामाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना शासन निर्णय दिनांक १४.०७.२०१५ अन्वये प्राधिकृत करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राचे संकल्पचित्र व बांधकाम आराखडा तयार करण्यासाठी वास्तुविशारदाची नियुक्ती करावयाची आहे. याकरीता वास्तुविशारदाकडून प्राप्त होणाऱ्या देकाराची छाननी करण्यासाठी कॉन्सिल ऑफ आर्किटेक्चर, नवी दिल्ली यांच्या नियमानुसार ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्सची नियुक्ती करणे आवश्यक आहे. त्यानुसार ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्स यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राचे संकल्पचित्र व बांधकाम आराखडा तयार करण्यासाठी वास्तुविशारदाकडून प्राप्त होणाऱ्या संकल्पनांची छाननी करण्यासाठी कॉन्सिल ऑफ आर्किटेक्चर, नवी दिल्ली यांच्या नियमानुसार ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्सची नियुक्ती करण्यांस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्सची रचना खालील प्रमाणे राहील.

१. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे - अध्यक्ष
२. मुख्य वास्तुविशारद, महाराष्ट्र राज्य. - सदस्य
३. जे.जे. स्कुल ऑफ आर्कीटेक्टचे प्राचार्य किंवा त्यांचे प्रतिनिधी. - सदस्य
४. खाजगी नामांकित व्यावसायिक वास्तुविशारद, - सदस्य
५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई, - सदस्य

२. सदर ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्स यांनी पात्रता पूर्ण करणाऱ्या वास्तुविशारदाकडून प्राप्त होणाऱ्या संकल्पनांची छाननी करुन निवड करावी.

३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी उपरोक्त ज्युरी तथा बोर्ड ऑफ असेसर्सचे मधील अध्यक्ष व सदस्य यांच्या समावेश स्वारस्य अभियोक्तिच्या (EOI) मसुदयामध्ये अंतर्भुत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०५१५००११०९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.09.05 15:02:48 +05'30'

(ल.गो. ढोके)
उप सचिव

प्रति,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
६. विभागीय आयुक्त, नागपूर
७. जिल्हाधिकारी, नागपूर
८. कार्यकारी अधिकरी, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
९. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
१०. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
११. संचालक, पुरातत्वे आणि संग्रहालय, महाराष्ट्र राज्य
१२. मुख्य वास्तुविशारद, महाराष्ट्र राज्य.
१३. प्राचार्य, जे.जे. स्कुल ऑफ आर्कीटेक्ट, मुंबई
१४. खाजगी नामांकित व्यावसायिक वास्तुविशारद, मुंबई
१५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१६. निवड नस्ती (का.०५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.